जी-२० परिषद निमित्त मुंबई येथे आयोजित सांस्कृतिक कार्यक्रमाच्या खर्चास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्र.संकीर्ण ८२२३ /प्र.क्र.३७४/सां.का.४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : १७ ऑगस्ट, २०२३

वाचा :- १. सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र.सां.का.सं./२८७४, दिनांक १५ मे, २०२३.
२. सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांचे पत्र .सां.का.सं./२८७०, दिनांक १५ मे, २०२३.
३. सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांचे पत्र .सां.का.सं./२८६९, दिनांक १५ मे, २०२३.
४. सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांचे पत्र .सां.का.सं./३७४०, दिनांक ९ जुलै, २०२३.

**प्रस्तावना :-**

जी-२० परिषदेच्या पुणे येथील बैठकीच्या अनुषंगाने आयोजित करण्यात आलेल्या महाराष्ट्राची लोककला व इतर संस्कृती विषयक बाबी सांस्कृतिक कार्यक्रमाद्वारे त्यांचा विश्वव्यापी प्रचार व प्रसार व्हावा या हेतूने विभागाकडून सांस्कृतिक कार्य संचालनालयामार्फत महाराष्ट्राची संस्कृती दर्शविणारा कार्यक्रम व त्यावरील खर्चास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

जी-२० परिषदेच्या निमित्ताने मुंबई येथे संपन्न झालेल्या खालील तक्त्यात नमूद कार्यक्रम आयोजनावरील एकूण खर्च रुपये ८४.६५ लक्ष (रुपये चौऱ्याऐंशी लक्ष पासष्ट हजार फक्त) इतक्या खर्चास या शासन निर्णयान्वये प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | विषय | कार्यक्रमाचा कालावधी | रक्कम रुपये लक्ष |
|---|---|---|---|
| १ | एनर्जी वर्कींग ग्रुप | १५ ते १७ मे, २०२३ | १३.०० लक्ष |
| २ | आपत्ती व्यवस्थापन | १८ ते २० मे, २०२३ | १२.०० लक्ष |
| ३ | पर्यावरण व वातावरणीय बदल | २१ ते २३ मे, २०२३ | २०.०० लक्ष |
| ४ | RIIG मंत्रीस्तरीय बैठक | ४ ते ५ जुलै, २०२३ | ३९.६५ लक्ष |
| | | **एकूण रुपये** | **८४.६५ लक्ष** |

२. सदरचा खर्च सदर खर्च लेखाशिर्ष मागणी क्र. झेडडी-२, २२०५, कला व संस्कृती, १०२, कला व संस्कृती प्रचालन, (०२) राज्य नृत्य, नाट्य, तमाशा व संगीत महोत्सव, (०२) (०२) राज्य कला संस्कृति जतन, संवर्धन विविध महोत्सव तसेच इतर कार्यक्रम (कार्यक्रम) (२२०५ १५०७) - ५० इतर खर्च या लेखाशिर्षाखाली सन २०२३-२४ या वर्षासाठी मंजूर असलेल्या आर्थिक तरतुदीतून भागविण्यात यावा.

३. यासाठी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना नियंत्रण अधिकारी तसेच लेखाधिकारी, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. सदर खर्च वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/विनिमय, दिनांक १७ एप्रिल, २०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-३, अ.क्र. ४ परिच्छेद क्र. २७ (२) (अ) अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त अधिकारानुसार मंजूर करण्यात येत आहे.

५. सदर प्रकरणी वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. अर्थसं-२०२३/ प्र.क्र.४०/ अर्थ-३, दिनांक १२ एप्रिल, २०२३ मधील सर्व परिच्छेद व परिशिष्टातील अटींनुसार कार्यवाही करण्याची जबाबदारी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांची राहील. तसेच, सदर कार्यक्रमाची देयके हा शासन निर्णय निर्गमित झाल्यापासून संपूर्णपणे संबधितांना अदा करण्याची कार्यवाही १५ दिवसाच्या आत करण्याची जबाबदारी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांची असेल.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२३०८१७१८३७५३४४२३ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

ANIROODHA SURYAKANT DESHPANDE

Digitally signed by ANIROODHA SURYAKANT DESHPANDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TOURISM AND CULTURAL AFFAIRS DEPARTMENT, 2.5.4.20=d34fa92fd12dd57b9647dbd172129b5c0eb8b1cd7ff442b98831311214458302, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=0D09B1312327B281B742D56CD04EE1899269D4FAAF88991AC3364BDCC437CF37, cn=ANIROODHA SURYAKANT DESHPANDE
Date: 2023.08.18 15:23:20 +05'30'

**( अनिरुध्द सु. देशपांडे )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मंत्री, सांस्कृतिक कार्य यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
२. प्रधान सचिव यांचे स्वीय सहाय्यक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
३. उप सचिव ( सां.का.) यांचे स्वीय सहाय्यक, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
४. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, जुने सचिवालय इमारत, एम.जी. रोड, मुंबई
५. कार्यासन अधिकारी (अर्थसंकल्प), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग, मंत्रालय, मुंबई
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
८. महालेखापाल (लेखा परीक्षा) - १ महाराष्ट्र, मुंबई
९. महालेखापाल (लेखा परीक्षा) - २ महाराष्ट्र, नागपूर
१०. महालेखापाल (लेखा अनुज्ञेयता) - १ महाराष्ट्र, मुंबई
११. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)- २ महाराष्ट्र, नागपूर
१२. निवड नस्ती, सां.का.४.